**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत सर्वसाधारण बालकांसाठी मंजूर केलेल्या अधिक २५ पैसे तरतूदीमधून मल्टीविटॅमिनचा पुरवठा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय ,क्रमांक :एबावि २०११/प्र.क्र. १८७ /का-५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १ ऑगस्ट, २०११

**वाचा :-** आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे यांचे पत्र क्रमांक एबाविसे/का-२ /३०२७ /२०११, दिनांक १९.७.२०११

**शासन निर्णय :-** एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत नागरी व ग्रामीण प्रकल्पातील ७७८७५ कार्यरत अंगणवाडयामधील १ ते ३ वर्षे वयोगटातील १७२१२८० सर्वसाधारण बालकांना प्रति दिन २.५ मि.ली. प्रमाणे ८० दिवसांसाठी २०० मि.ली. ची १ बाटली या प्रमाणे १७२१२८० मल्टीविटॅमिन सिरप बॉटल्स DMER यांच्या दर कराराप्रमाणे प्रति २०० मि.ली. बॉटल रू ३६/- प्रमाणे सर्वसाधारण बालकांसाठी मंजूर केलेल्या अधिक २५ पैसे तरतूदीतून खरेदी करण्यास व त्यासाठी येणा-या रु ६,१९,६६,०८०/- ( रुपये सहा कोटी एकोणीस लाख सहासष्ट हजार ऐंशी फक्त) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये खालील अटी नुसार मान्यता देण्यात येत आहे.

i) उपलब्ध तरतूदीतून विहीत पध्दतीचा अवलंब करून खरेदी करण्यात यावी.,

ii) पुरवठयाच्या वेळी उत्पादन दोन महिन्याच्या आतील असावे व मुदतबाहयतेचा कालावधी (Expiry Date) एक वर्षापेक्षा कमी नसावा ,

iii) पुरवठादाराने मागणी प्रमाणे विहीत प्रमाणात , विहीत केलेल्या गुणवत्ते नुसार निश्चित केलेल्या ठिकाणी मालाचा पुरवठा करण्यात आलेला आहे , व २५ पैसे प्रमाणे उपलब्ध होणा-या निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याबाबतची खात्री करण्यात यावी. खरेदी / वाटप / पुरवठा व जादा खर्च यामध्ये अनियमितता झाल्यास त्याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांची राहील.

iv) तसेच या योजनेचा लाभ लाभार्थ्यांना पोहचावा या दृष्टीने औषधाचा डोस किती प्रमाणात दयावा याबाबत स्वंयस्पष्ट माहिती पत्रक , अगणवाडयात नोंद वहीमध्ये औषधाच्या उत्पादनाचा दिनांक / एकूण पुरवठा / एकूण उपयोग / मुदत बाहयतेचा दिनांक व शिल्लक याबाबतची योग्य नोंद ठेवण्याबाबत , औषधी घटक विहीत प्रमाणानुसार असल्याचे प्रयोगशाळेतून तपासून खात्री करणे , उपयोगानंतर रिकाम्या बाटल्यांची पंचापुढे योग्य रितीने विल्हेवाट लावणे व त्याची नोंद ठेवणे , इ. बाबत उचित **मार्गदर्शक सूचना** आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी दयाव्यात.

२. यासाठी होणारा खर्च सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात २२३६-पोषण आहार,०२, पोषक अन्न व पेये यांचे वितरण, (०३) (०१) - महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान (२२३६००२७) (स्थानिक क्षेत्र) - १९ आहार खर्च आणि २२३६-पोषण आहार , ०२ पोषक अन्न व पेये यांचे वितरण, १०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम, नागरी (०१) (०१) पोषण आहार कार्यक्रम (२२३६०१८१) , १९ आहार खर्च या लेखाशिर्षा खाली भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. याकरिता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना आहरण, संवितरण व नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३.	हा शासन निर्णय वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक खर्चनि-१००६/प्र.क्र.१/अर्थोपाय, दि.२०.४.२००६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(श.पा.वारे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे
संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा, (आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे यांचे मार्फत)
संबंधित उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण ), (आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे यांचे मार्फत)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
ग्रथालय, विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांचे मार्फत)
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
महिला व बाल विकास विभाग, कार्या-४.
निवड नस्ती (कार्यासन-५)